दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर संवर्गातील १२३० पदांपैकी ११२ पदे कायम स्वरुपी श्रेणीवाढ करुन दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर पदांमध्ये रुपांतरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-डीएजे-१५१५/६९९/प्र.क्र.१३०/का.तीन,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ जुलै, २०१७.

**वाचा :-** १) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.डीएजे-२०१२/१०५५/प्र.क्र.१९०/का.३, दि.०६.०१.२०१५.
२) मा.उच्च न्यायालयाचे क्र.बी (डब्ल्यू)ए-२१०४/२०१५/२१४/२०१५, दि.१३.०८.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन क्र.१ अन्वये रिट याचिका क्र.१४०/२००५ श्री.ब्रिजमोहन विरुध्द युनियन ऑफ इंडिया या याचिकेच्या अनुषंगाने मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार व मुंबई उच्च न्यायालयाच्या प्रशासनाच्या शिफारशीनुसार राज्यातील दुय्यम न्यायालयातील दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर या संवर्गाची ११२ पदे नव्याने निर्माण करण्यात आली आहेत व परिणामी महाराष्ट्र राज्यात सदर संवर्गाची एकूण पदे १२३० झाली आहेत.

२. मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार मा.न्या.शेट्टी आयोगाच्या शिफारशी विवक्षित सुधारणा करुन महाराष्ट्र राज्याने स्विकारलेल्या आहेत. सदर शिफारशींच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्यात दुय्यम न्यायालयाची त्रिस्तरीय यंत्रणा कार्यरत आहे. मा.उच्च न्यायालयाच्या दि.१३.०८.२०१५ च्या पत्रामध्ये सदर त्रिस्तरीय यंत्रणेत जिल्हा न्यायाधीश संवर्गाची ३७० पदे, दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर संवर्गाची ३८८ पदे व दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर संवर्गाची १२३० पदे अस्तित्वात असल्याचे नमूद केले आहे. सदर पदसंख्या विचारात घेता ती पिरॅमिडप्रमाणे असल्याचे दिसून येत नाही. यास्तव, संदर्भाधीन क्र.२ अन्वये मा.उच्च न्यायालयाने सदर पदांची संख्या पिरॅमिडप्रमाणे करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाकडे सादर केला आहे.

३. तसेच मा.मुख्य न्यायाधीश मुंबई उच्च न्यायालय व मा.मुख्यमंत्री यांच्यामध्ये दि.०१.०४.२०१७ रोजी झालेल्या बैठकीमध्ये सदर विषय ठेवण्यात आला होता व त्या विषयावर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला.

It was agreed and decided to increase the cadre strength of Senior Civil Judges within the existing strength of Judges as a part of cadre review.

Let the concerned officials take follow-up action.

४. उपरोक्त सर्व बाबी विचारात घेता, महाराष्ट्र राज्यातील दुय्यम न्यायालयातील न्यायिक अधिकाऱ्यांच्या पदसंख्येमध्ये समतोल राखण्यासाठी (to ensure pyramidal structure) दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर या पदाची संख्या वाढविणे आवश्यक आहे. त्यानुसार दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर यांच्या ३८८ पदांमध्ये वाढ करुन ती ५०० करण्याचा तसेच दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर या १२३० पदांमध्ये घट करुन ती १११८ करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता व त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर या संवर्गातील एकूण १२३० पदांपैकी ११२ पदे दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर/महानगर दंडाधिकारी या पदांमध्ये कायम स्वरुपी श्रेणीवाढ करुन रुपांतरीत करण्यास खाली दर्शविल्याप्रमाणे या शासन निर्णयान्वये मंजूरी देत येत आहे :-

| अ.क्र. | पद | वेतनश्रेणी (पद्मनाभन समितीनुसार) | मंजूर पदसंख्या (दि.१३.०८.२०१५ रोजीची) | रुपांतर करावयाच्या पदांची संख्या | श्रेणीवाढ व रुपांतरित केल्यानंतरची पदसंख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर | २७७००-७७०-३३०९०-९२०-४०४५०-१०८०-४४७७० | १२३० | **११२** | **(१२३०-११२) १११८** |
| २ | दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर | ३९५३०-९२०-४०४५०-१०८०-१२३०-५४०१० | ३८८ | **११२** | **(३८८+११२) ५००** |

२. यासाठी होणारा खर्च, "मागणी क्रमांक जे-१, २०१४ न्यायदान (दत्तमत), १०५ दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश अनिवार्य (२०१४ ०१७२) या लेखाशिर्षाखाली ०१- वेतन या उद्दिष्टांतर्गत सन २०१७-१८ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९७२/बारा, दि.१६.०७.२०१६ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४५९/व्यय-५, दि.०५.०६.२०१७ तसेच क्र.२७०/आ.पु.क, दि.३०.०६.२०१७ अन्वये मा.मुख्य सचिव तथा अध्यक्ष, उच्चस्तरीय सचिव समिती यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर निर्णय हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक क्र. २०१७०७१४११२८२२४०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Neeraj Pradip Dhote

Digitally signed by Neeraj Pradip Dhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ecf8ac6cd2050be6b2f1a2e67257b46e511d059da5a2b598b641533ab0393dac, cn=Neeraj Pradip Dhote
Date: 2017.07.14 11:24:57 +05'30'

**( नी.प्र.धोटे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा,
४. मा.राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे स्वीय सहायक,
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
६. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. अ.मु.स. (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. प्रधान सचिव (विधि विधान), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,(२ प्रती)
१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य,
१४.प्रधान महालेखापाल-एक/दोन (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१५.प्रधान महालेखापाल-एक/दोन (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१६.प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
१७.मुख्य न्यायाधीश, लघुवाद न्यायालय, मुंबई,
१८. सर्व प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,
१९.प्रमुख न्यायाधीश, सर्व कौटुंबिक न्यायालये,
२०.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई,
२१.धर्मादाय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२२.विधि व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने,
२३.विधि व न्याय विभाग/का.७ (आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
२४.सामान्य प्रशासन विभाग/का.१२, मंत्रालय, मुंबई.
२५.वित्त विभाग/व्यय-५, व आकृतीबंध पुनर्रचना कक्ष,
२६.विधि व न्याय विभागातील सर्व शाखा व कार्यासने,
२७.निवड नस्ती/का.३.